**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या वर्षासाठी शालांत व उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षेतील आदिवासी विद्यार्थी मुलांना व मुलींना विशेष प्रोत्साहन या योजनेकरीता निधी वितरण.**
**(लेखाशिर्ष २२२५३४११)**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/ कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ३० मार्च, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५.
३) आदिवासी विकास विभाग, शासन ज्ञापन क्र.बीयुडी-२०२५/प्र.क्र. ५४/का-६
४) आदिवासी विकास विभाग नस्ती क्र. शाआशा-११२५/प्र.क्र. ४८/का-१३.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांची गुणवत्ता वाढविण्यासाठी विशेष शिकवणी वर्ग या योजनेतून शालांत व उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षेतील आदिवासी विद्यार्थी मुलांना व मुलींना विशेष प्रोत्साहन या योजनेसाठी पुनर्विनियोजनाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याबाबत संदर्भाधीन क्र. ४ अन्वये प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२२५, शालांत व उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षेतील आदिवासी विद्यार्थी मुलांना व मुलींना विशेष प्रोत्साहन या योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२४-२५ साठी मंजूर सुधारीत अंदाज** | **सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| शालांत व उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षेतील आदिवासी विद्यार्थी मुलांना व मुलींना विशेष प्रोत्साहन | २२२५३४११ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ४२.०० | ६७.२० |

२. उपरोक्तप्रमाणे **रु.६७.२० लाख (रुपये सदुसष्ट लाख वीस हजार फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९५/२०२५/व्यय-१४, दि.२७.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मंजुरीस अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३३०१३०९१५५३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2025.03.30 13:52:52 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कक्ष अधिकारी, का-१३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.